<u>**विंधण विहिरींची खोली वाढविणेबाबत**</u>

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन परिपत्रक क्र.आपना १०१०/ प्र.क्र.३०/पापु १५
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक- ३० मार्च, २०१०

**शासन परिपत्रक :-**

राज्यामध्ये असमाधानकारक पर्जन्यमानामुळे काही भागात निर्माण झालेली पिण्याच्या पाण्याची टंचाई व भूजल पातळीत झालेली घट यामुळे काही जिल्हा प्रशासनांकडून २०० फूटापेक्षा अधिक खोलीच्या विंधण विहिरी घेण्यास परवानगी देण्याबाबत मागणी होत आहे. अतिखोलीचा भूजल साठा हा confined aquifer मधला असून त्याचे पुनर्भरण होण्यास बराच कालावधी लागतो अथवा त्याचे पूर्णपणे पुनर्भरण होत नाही. या परिस्थितीचा साकल्याने विचार करता ६० मीटरपेक्षा अधिक खोलीची विंधन विहिर घेण्याबाबत पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या नविन विंधन विहिरींची खोली वाढविण्यास सरसकट परवानगी देण्यात येऊ नये.
२. महाराष्ट्र भूजल (पिण्याच्या पाण्याच्या प्रयोजनार्थ विनियमन) अधिनियम १९९३ मधील कलम ४ नुसार जिल्हाधिकारी यांनी टंचाई परिस्थिती घोषित केलेल्या क्षेत्रातील टंचाई कृती आराखडयात प्रस्तावित गाव/वाडयांमध्ये ६० मीटर खोलीपेक्षा जास्त खोलीची विंधन विहिर घेण्याची आवश्यकता भासल्यास, जिल्हाधिकारी यांनी प्रकरणनिहाय संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांच्या सल्ल्याने निर्णय घ्यावा.
३. वरील बाब क्र. २ प्रमाणे ६० मिटरपेक्षा अधिक खोलीची विंधन विहिर खोदण्यास जिल्हाधिका-यांनी परवानगी दिल्यास सदर बाब प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना १० दिवसात न चुकता कळविण्यात यावी.
४. विंधन विहिरींची खोदाई चालू असताना, ६० मीटर खोलीपर्यंत जर पाणी लागले तर विंधण विहिरींचे पुढील आवेधन काम करण्यात येऊ नये.

२. हे शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३३०१७४४४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श.वि.दुर्वे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. विभागीय आयुक्त, (सर्व)
२. जिल्हाधिकारी (सर्व)

G:\tanchai 200 m.doc

३. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,सर्व
५. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
६. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व,
७. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
८. उप अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद सर्व
९. कार्यासन अधिकारी (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने
११. निवड नस्ती पापु १५